शैक्षणिक वर्ष २०१५-१६ :
अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयांमध्ये
अतिरिक्त तुकडयांना मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन आदेश क्रमांकः एनजीसी २०१४/(१०३/१४)/मशि-४
मंत्रालय विस्तार भवन,
मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ३० ऑगस्ट, २०१४.

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः एनजीसी २०१०/(१९३/१०)/मशि-४,दि. ३० ऑक्टोंबर २०१०.
२) शासन निर्णय क्रमांकः एनजीसी २०१२/(२४७/१२)/मशि-४, दि. २ सप्टेंबर २०१३.

संदर्भ -

३) कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई यांचे पत्र क्र. संलग्नता/आयसीडी/२०१४-१५/६७०, दि. ३०.४.२०१४.
४) कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई यांचे पत्र क्र. पवि/२/आयसीडी/२०१४-१५/७१, दि. ३०.४.२०१४.
५) कुलसचिव, पुणे विद्यापीठ, पुणे यांचे पत्र क्र. सीए/३९१३, दि. २५.४.२०१४.
६) संचालक, बी.सी.यु.डी. श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ,मुंबई यांचे पत्र क्र.ॲफी.जन.१/शासकीयपत्रव्यवहार/२०१४-१५/१३८, दि.२९.४.२०१४
७) कुलसचिव, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर यांचे पत्र क्र. मविविमं/२०१४/पी/३४७, दि. २९.४.२०१४.
८) संचालक, बी.सी.यु.डी., उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव यांचे पत्र क्र. उमवि/५/प्रस्ताव २०१४-१५/१६२/२०१४, दि. २६.४.२०१४.
९) कुलसचिव, संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती यांचे पत्र क्र. संगाबाअवि/८/सी-६५९/२०१४, दि. २९.४.२०१४.
१०) संचालक, बी.सी.यु.डी., सोलापूर विद्यापीठ, सोलापूर यांचे पत्र क्र. SUS/BCUD/AFFI/९५८, दि. २९.४.२०१४.
११) कुलसचिव, गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली यांचे पत्र क्र. गो.वि.ग./कुलसका/ ३८४२/२०१४, दि. २१.४.२०१४.
१२) संचालक, बी.सी.यु.डी., शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर यांचे पत्र क्र. शिवाजी वि./संलग्नता-टी-२/(पदवी-पदव्युत्तर)/नवीन तुकडी २०१४-१५/६४३, दि.२५.४.२०१४
१३) संचालक, बी.सी.यु.डी., स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड यांचे पत्र क्र. शैक्षणिक/संलग्न/२०१३-२०१४/४३१६, दि. २८.४.२०१४.
१४) संचालक, बी.सी.यु.डी., डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद यांचे पत्र क्र. शैक्ष/संलग्न/२०१३-२०१४/२८२५-२८, दि. २८.४.२०१४.
१५) शासन आदेश क्रं. एनजीसी २०१४/(१०३/१४)/मशि-४ दि. १४ जून २०१४.
१६) शासन पत्र क्रं. एनजीसी २०१४/(१००/१४)/मशि-४ दि. ५ जुलै २०१४.

.

## शासन आदेश

महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ८२ व ८३ मधील तरतुदीनुसार राज्यातील अकृषि विद्यापीठांनी शैक्षणिक वर्ष २०१४-१५ साठी नवीन अतिरिक्त तुकडयांच्या मान्यतेसाठीचे प्रस्ताव उपरोक्त संदर्भाधीन क्र. ३ ते १४ येथील पत्रान्वये शासनाकडे सादर केले आहेत. सदर प्रस्तावांची शासन निर्णय क्र. एनजीसी २०१०/(१९३/१०)/मशि-४, दिनांक ३० ऑक्टोबर, २०१० व शासन निर्णय एनजीसी २०१२/(२४७/१२)/मशि-४, दिनांक २ सप्टेंबर २०१३ अन्वये छाननी करण्यात आली. विद्यापीठाच्या शिफारशी, शासन स्तरावर केलेली छाननी व महाविद्यालयांनी प्राप्त केलेला नॅक दर्जा वा त्यासाठी दाखल केलेला अर्ज या बाबी विचारात घेऊन पात्र ठरलेल्या प्रस्तावांना संदर्भ क्रं. १५ येथील शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. त्यानंतर अपात्र संस्थांच्या त्रुटी संबंधित विद्यापीठामार्फत संस्थांना पाठविण्याच्या व त्या त्रुटींची पुर्तता करण्याच्या सुचना विद्यापीठांना संदर्भ क्रं. १६ येथील पत्रान्वये देण्यात आल्या होत्या. त्याअनुषंगाने विद्यापीठांनी शासनास सादर केलेल्या त्रुटी पुर्तता अहवालांची पुर्नछाननी करण्यात आली. सदर पुर्नछाननी अंती पात्र ठरलेल्या प्रस्तावांना महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम १९९४ मधील कलम ८२(५) व ८३(५) अन्वये शासनास प्राप्त अधिकारानुसार पुढील विवरणात नमूद केल्यानुसार कायम विना अनुदान तत्वावरील अतिरिक्त तुकडयांना खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून इरादा पत्र (Letter of Intent) देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | प्रस्तावित महाविद्यालयाचे नाव व ठिकाण | तुकडी |
|---|---|---|---|
| **मुंबई विद्यापीठ, मुंबई** | | | |
| १. | वाडा निर्मती फाऊंडेशन | वाडा कॉलेज ऑफ मॅनेजमेंट अँड सायन्स, वाडा परली रोड, हरोसले वाडा, ठाणे | **बी.एम.एस.**-प्रथम वर्ष (२ री अतिरीक्त तुकडी) |
| **एस.एन.डी.टी. विद्यापीठ, मुंबई** | | | |
| २. | महर्षी कर्वे स्त्री शिक्षण संस्था | के. बी. जोशी इन्स्टिटयुट ऑफ टेक्नॉलॉजी, कम्मिनस् कॉलेज कॅम्पस, कर्वे नगर, पुणे | **बी.सी.ए.** |
| **पुणे विद्यापीठ, पुणे** | | | |
| ३. | कुकडी एज्युकेशन सोसायटी | सावित्रीबाई कला महाविद्यालय, पिंपळगाव पिसा, ता. श्रीगोंदा, जि. अहमदनगर | **बी.ए.** - प्रथम वर्ष - १ तुकडी |
| ४. | श्री. वाघेश्वर ग्रामविकास प्रतिष्ठाण | श्री वसंतराव फराटे पाटील कला वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, मांडवगन फराटा, ता.शिरुर, जि. पुणे | **बी.ए.** - प्रथम वर्ष - १ तुकडी |
| ५. | भारतीय जैन संघटना | भारतीय जैन संघटना कॉलेज, बकोरी फाटा वाघोली, पुणे नगर रोड, ता. हवेली, जि. पुणे | **एम.कॉम.** - प्रथम वर्ष - १ तुकडी<br>**बी.कॉम.** - प्रथम वर्ष - १ तुकडी |
| ६. | कै उद्धवराव तुळशीराम जाधवर फाऊंडेशन | डॉ. सुधाकर जाधवर कला व वाणिज्य महाविद्यालय, मानाजी नगर, | **बी.कॉम.** - प्रथम वर्ष - १ तुकडी |

| अ.क्र. | संस्थेचे नाव व पत्ता | प्रस्तावित महाविद्यालयाचे नाव व ठिकाण | तुकडी |
|---|---|---|---|
| | | न-हे धायरी, ता. हवेली, जि. पुणे | |
| ७. | सुभद्रा एज्युकेशनल सोसायटी | एस.एन.बी.पी. विधी महाविद्यालय, मोरवाडी, पिंपरी, जि.पुणे | **विधी** - बॅचलर ऑफ लॉ (३ वर्षे) - प्रथम वर्ष - १ तुकडी |
| **उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव** | | | |
| ८. | आदिवासी शिक्षण प्रसारक मंडळ | महाराज जे. पी. वालवी आट्‌र्स, कॉमर्स अंड श्री व्ही.के.कुलकर्णी सायन्स कॉलेज, धाडगाव, ता. अक्रणी, जि. नंदुरबार | **बी.ए.** - ३ रे वर्ष |
| **संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती** | | | |
| ९. | | कॉलेज ऑफ मॅनेजमेंट, खामगाव, ता. खामगाव, जि. बुलडाणा | **बी.ए.** - भाग-१ अतिरीक्त तुकडी |
| १०. | | अकोला विधी महाविद्यालय, अकोला | **एल.एल.बी.** - (३ वर्षीय) |
| ११. | | इंदिरा गांधी कला महाविद्यालय, राळेगांव, जि. यवतमाळ | **बी.ए.**-भाग-१ अतिरिक्त तुकडी |
| **सोलापूर विद्यापीठ, सोलापूर** | | | |
| १२. | | डी.ए.व्ही.वेलणकर वाणिज्य महाविद्यालय, सोलापूर, जि. सोलापूर | **एम.कॉम.** - भाग-२ |
| **डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा औरंगाबाद विद्यापीठ, औरंगाबाद** | | | |
| १३. | | कोहिनूर कला, वाणिज्य विज्ञान महाविद्यालय, ता. खुलताबाद, जि. औरंगाबाद | **बी.एस्सी.** - प्रथम वर्ष - १ अतिरीक्त तुकडी |
| १४. | अमोलक जैन विद्या प्रसारक मंडळ, कडा | कला, वाणिज्य, विज्ञान महाविद्यालय, ता. आष्टी, जि. बीड | **बी.एस्सी,** - प्रथम वर्ष - १ अतिरीक्त तुकडी |

अटी व शर्ती:-

१. अस्तित्वात असलेल्या ज्या महाविद्यालयात नवीन अतिरिक्त तुकडया मंजूर करण्यात आलेल्या आहेत, त्या महाविद्यालयांनी संबधित विभागीय सहसंचालकांकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची मागणी करणार नाहीत असे हमीपत्र रु. १००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टँप पेपरवर सादर करावे.
२. महाविद्यालयाने शासनाची अंतिम मान्यता प्राप्त झाल्यानंतर आवश्यक ते हमीपत्र संबंधित विभागीय सहसंचालकांकडे सादर करावे व संबंधित विभागीय सहसंचालकांकडून वरील हमीपत्र प्राप्त झाल्याशिवाय विद्यापीठाने संलग्नतेची प्रक्रिया सुरु करु नये.
३. महाविद्यालयाने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

४. ही मान्यता शैक्षणिक वर्ष २०१५-१६ पासून लागू होणार असल्याने देण्यात येत असलेले इरादा पत्र हे फक्त ३१ मार्च २०१५ पर्यंतच वैध राहील. तत्पुर्वी शासनाची अंतिम मान्यता घेणे आवश्यक राहील.

५. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या (ॲफिलिएशन ऑफ कॉलेजस बाय युनिव्हर्सिटीज) रेग्युलेशन २००९ मध्ये महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याबाबत विहित निकषांची पूर्तता केल्याशिवाय संबंधित महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याची कार्यवाही विद्यापीठाने करु नये.

उपरोक्त विवरणपत्रातील महाविदयालयांना नवीन अतिरिक्त तुकडया हया शासन निर्णय दिनांक २.९.२०१३ मधील निकष, जमीन अकृषक करण्यासाठी सक्षम प्राधिकारणाकडे केलेला अर्ज, नॅक मुल्यांकन/पुर्नमुल्यांकनासाठी संबंधित सक्षम प्राधिकारणाकडे दाखल केलेल्या अर्जांच्या अधीन राहून इरादा पत्र (Letter of Intent) देण्यात येत आहे. सदर अटीची पुर्तता संबंधित संस्थांनी ३१ जानेवारी २०१५ पुर्वी केली असल्याची खातरजमा संबंधित विदयापीठाने व संबंधित सहसंचालकांनी करून त्याबाबतचा अहवाल १५ फेब्रुवारी २०१५ पुर्वी शासनास सादर करणे आवश्यक राहील. प्राप्त झालेला अहवाल विचारात घेऊन १५ मार्च २०१५ पर्यंत शासनाकडून अंतिम मान्यता (Letter of Approval) प्रदान करण्यात येईल. शासनाची अंतिम मान्यता प्राप्त झाल्यानंतरच विदयापीठांनी संलग्निकरणाबाबतची कार्यवाही सुरू करावी.

संबंधित विद्यापीठ व विभागीय सहसंचालकांनी मंजूर करण्यात आलेल्या अतिरिक्त तुकडयांचा नियतकालिक आढावा घेऊन सदर नवीन अतिरिक्त तुकडयांमध्ये मंजुर विद्यार्थी संख्येच्या ५०% किंवा त्यापेक्षा कमी विद्यार्थी दिसून आल्यास सदर नवीन अतिरिक्त तुकडयांची मान्यता रद्द समजून तसे शासन व विद्यापीठाच्या माहितीने विभागीय सहसंचालकांनी आदेश काढावेत. मा. उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठ, नागपूर येथे दाखल झालेल्या याचिका क्रमांक २४४६/२०१३ व २४४८/२०१३ मध्ये उपस्थित केलेल्या बाबी विचारात घेता या अटी संदर्भात आवश्यक ती कार्यवाही करण्याची जबाबदारी सबंधित विद्यापीठ व विभागीय सहसंचालक यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२२१२०१२१८७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nivruti Bhaguji Marale

Digitally signed by Nivruti Bhaguji Marale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Nivruti Bhaguji Marale
Date: 2014.08.30 15:17:55 +05'30'

**नि.भा. मराळे**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य
२. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य
४. संबंधित संस्था, (विद्यापीठामार्फत)
५. निवड नस्ती (मशि-४)